**राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत राज्य आरोग्य सोसायटीस सन २०१४-१५ चा प्रलंबित केंद्र हिस्सा रु. ९०.२२ कोटी मंजूर करणेबाबत ...**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः साआवि-३००११/३५१/२०१५/आ-७**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
१० वा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक: ५ जून, २०१५

**वाचा -**

१) आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र. जी २०१०१३/१/२०१४- सीसी व व्ही (२६), दि. २४/१२/२०१४ चे पत्र.
२) आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र. टि १३०११/०३/२०१४-सीसी व व्ही (२६), दि. ०२/०१/२०१५ चे पत्र.
३) आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र. जी २७०१७-२२/२०१४-१५, एनएचएम (एफ़)/३, दि. २४/०३/२०१५ चे पत्र.
४) आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र. जी २७०१७/२६/२०१४-१५, एनएचएम (एफ़)/१, दि. ३०/०३/२०१५ चे पत्र.
५) आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र. जी २७०१७/०५/२०१४-१५, एनआरएचएम (एफ़)/१, दि. ३०/०३/२०१५ चे पत्र.
६) आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र. जी २७०१७-२६/२०१४-१५, एनएचएम वित्त/३, दि. ३१/०३/२०१५ चे पत्र.

**प्रस्तावना -**

गरजू ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह अश्या सर्व प्रकारच्या आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले आहे. या अभियानामध्ये प्रजनन व बाल आरोग्य, मिशन फ़्लेक्झीपुल, नियमित लसीकरण व अन्य चार महत्वाचे राष्ट्रीय कार्यक्रम अंतर्भूत आहेत. सदर अभियानासाठी केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण ७५:२५ असे आहे. सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात केंद्र शासनाकडून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानातर्गत प्रजनन व बाल आरोग्य, मिशन फ़्लेक्झीपुल, लसीकरण, पल्स पोलिओ लसीकरण तसेच

कृ.मा.प.

पायाभूत सुविधा व देखभाल यासाठी सर्वसाधारण प्रवर्गाकरीता एकूण रु. ८५२०२.०२ लाख प्राप्त झाले आहेत. सदर प्राप्त निधीपैकी रु. ७६१७९.४ लाख वितरीत करण्यात आले असून केंद्र शासनाने सन २०१४-१५ मध्ये उपरोक्त आदेशान्वये वितरीत केलेले एकूण रु. ९०२२.६२ लाख वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय** -

राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत राबविण्यात आलेल्या कार्यक्रमांसाठी केंद्र शासनाने सन २०१४-१५ मध्ये केंद्र हिश्श्यापोटी मंजूर केलेले रु. ९०,२२,६२,०००/- (रुपये नव्वद कोटी बावीस लाख बासष्ठ हजार फक्त) वितरीत करण्यास पुढीलप्रमाणे मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | कार्यक्रम | मंजूर रक्कम (रु. लाखात) |
|---|---|---|
| १ | प्रजनन व बाल आरोग्य | ४८०५.०० |
| २ | मिशन फ़्लेक्झीपुल | १०००.०० |
| ३ | लसीकरण | १२८३.६२ |
| ४ | पल्स पोलिओ लसीकरण | १९३४.०० |
| **एकूण** | | **९०२२.६२** |

२. सदर प्रस्तावावरील खर्च, मागणी क्र. आर- १, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६ - आरोग्य सेवा, ८०० - इतर खर्च, केंद्र पुरस्कृत योजना, (१८) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान , ३१ सहाय्यक अनुदान (२२१० एफ़ १५७) या मुख्य लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०१५-१६ या वित्तीय वर्षासाठी केलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रकमेचे देयक त्यांनी कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबीवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम संबंधीत कार्यक्रम अधिका-याकडे सुपूर्द करावी. यासाठी सह संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. २०१३प्र.क्र.८५/२०१३/अर्थसंकल्प-३ , दि. २५/४/२०13 नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२७/अर्थोपाय, दि. ०४/०६/२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१९१११३६३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manohar Sadhu Thombare

Digitally signed by Manohar Sadhu Thombare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manohar Sadhu Thombare
Date: 2015.06.05 18:18:45 +05'30'

**(मनोहर ठोंबरे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.

२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.

३. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

५. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई.
६. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
११. सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा) मंत्रालय, मुंबई.
१२. सार्वजनिक आरोग्य विभाग (लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (आरोग्य-७).